**मेळघाट व्याघ्र प्रकल्पाची पुनर्रचना आणि एकछत्री नियंत्रणानूसार १) विभागीय वन अधिकारी, मेळघाट (वन्यजीव), विभाग परतवाडा २) वनपरिक्षेत्र अधिकारी (वन्यजीव), गाविलगड ३) वनपरिक्षेत्र अधिकारी (वन्यजीव), जामली ४) वनपरिक्षेत्र अधिकारी (वन्यजीव), घटांग ५) वनपरिक्षेत्र अधिकारी (वन्यजीव), मेहकर या पदनामास आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : एफडीएम २०१९/प्र.क्र.११/फ-२**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक :-१४ फेब्रुवारी, २०१९**

**संदर्भ :-** १) वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक-मकोनि-१०००/प्र.क्र.४४/०५,कोषा-प्र.५ दि. ०४.०१.२००६.
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र.डब्ल्यूएलपी-०७१८/प्र.क्र.२६८/फ-१, दि.०४.१२.२०१८.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), नागपूर यांच्या कार्यालयाचे पत्र क्र.कक्ष-२(१)/असं/प्र.क्र.१९/(१८-१९)/८१५/२०१८-१९, दि.०८.०२.२०१९
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक व्याघ्र प्रकल्प, मेळघाट, अमरावती यांच्या कार्यालयाचे क्र. कक्ष-१/व्याप्रमे/आस्था/प्र.क्र.४०/१३१७/२०१८-१९ दि. ०६/०२/२०१९

**प्रस्तावना -**

शासनाच्या वन विभागाच्या क्षेत्रिय कार्यालयातील कर्मचाऱ्यांची वेतन व भत्यांची देयके फेब्रुवारी-२००६ पासून इतर विभागाच्या कर्मचाऱ्यांप्रमाणेच कोषागारातून पारित करण्याबाबत वित्त विभागाच्या संदर्भाधिन क्र.१ दि.०४.०१.२००६ च्या शासन निर्णयान्वये निर्णय घेण्यात आला आहे. यानुसार महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ खंड-१ मधील नियम १३ नुसार व नियम १५(३) नुसार विभागातील आहरण व संवितरण अधिकाऱ्यांची यादी महालेखापाल कार्यालयाकडे पाठविण्यात येते. यानुसार वेळोवेळी निर्गमीत केलेल्या शासन निर्णयानुसार विभागातील आहरण व संवितरण आधिकाऱ्यांच्या याद्या प्रसिध्द करण्यात आल्या आहेत.

२. त्याअनुषंगाने प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), नागपूर यांनी त्यांच्या संदर्भ क्र.३ येथील दि.०८.०२.२०१९ रोजीच्या पत्रान्वये प्रस्तावित केल्यानूसार तसेच संदर्भ क्र.४ येथील अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक व्याघ्र प्रकल्प, मेळघाट, अमरावती यांनी यांच्या दि.०६.०२.२०१९ रोजीच्या पत्रान्वये प्रस्तावित केल्यानूसार त्यांच्या अधिपत्याखालील १) विभागीय वन अधिकारी, मेळघाट (वन्यजीव), विभाग परतवाडा २) वनपरिक्षेत्र अधिकारी (वन्यजीव), गाविलगड ३) वनपरिक्षेत्र अधिकारी (वन्यजीव), जामली ४) वनपरिक्षेत्र अधिकारी (वन्यजीव), घटांग

५) वनपरिक्षेत्र अधिकारी (वन्यजीव), मेहकर या पदनामास आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्या अनुषंगाने सदरहू पदनामास "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महसूल व वन विभागाच्या संदर्भ-क्र.२ येथील दि.०४.१२.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये मेळघाट व्याघ्र प्रकल्पाचे पुनर्रचना आणि एकछत्री नियंत्रणानूसार मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती अंतर्गत नविन वन्यजीव विभाग/वनपरिक्षेत्राची निर्मीती करण्यात आलेली आहे. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), नागपूर यांच्या कार्यालयाने संदर्भ क्र.३ येथील दि.०८.०२.२०१९ रोजीच्या पत्रान्वये व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक व्याघ्र प्रकल्प, मेळघाट, अमरावती यांनी संदर्भ क्र.४ येथील दि.०६.०२.२०१९ रोजीच्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन तसेच वित्त विभागाच्या दि.०४.०१.२००६ रोजीच्या शासन निर्णयानूसार खालील अ.क्र.१ वरील विभागीय वन अधिकारी, मेळघाट, वन्यजीव विभाग परतवाडा या पदनामास मेळघाट वन्यजीव विभागीय कार्यालयाचे आस्थापनेवरील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व इतर भत्ते कोषागारामार्फत पारित करण्याकरीता व महालेखाकार, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना मासिक रोखलेखा (८७८२-धनादेश आहरण व ८७८२-वनभरणा) सादर करण्याकरीता तसेच अ.क्र. २ ते ५वरील पदनामांस परिक्षेत्र कार्यालयांतर्गत आस्थापनेवरील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व इतर भत्ते कोषागार कार्यालयात सादर करण्याकरीता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | वनवृत्त कार्यालय | आहरण व संवितरण अधिकारी घोषित करावयाचे पदनाम | मुख्यालय ठिकाण | जवळचे उपकोषागार कार्यालय व सांकेतांक क्र. |
|---|---|---|---|---|
| १. | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक व्याघ्र प्रकल्प, मेळघाट, अमरावती. | विभागीय वन अधिकारी, मेळघाट (वन्यजीव), विभाग परतवाडा | परतवाडा | अचलपूर (६१०२) |
| २. | | वनपरिक्षेत्र अधिकारी (वन्यजीव), गाविलगड | चिखलदरा | चिखलदरा (६१०४) |
| ३. | | वनपरिक्षेत्र अधिकारी (वन्यजीव), जामली | जामली | अचलपूर (६१०२) |
| ४. | | वनपरिक्षेत्र अधिकारी (वन्यजीव), घटांग | घटांग | अचलपूर (६१०२) |
| ५. | | वनपरिक्षेत्र अधिकारी (वन्यजीव), मेहकर | लोणार | लोणार (६३०८) |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संकेतांक २०१९०२१४१११४३५६०१९ असा आहे.हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Atul Ashok Kode

Digitally signed by Atul Ashok Kode
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a12403ed93b05957cb29b7e95265d3ac52d366233b8040 5514f23a879132aeec, serialNumber=f0d5ee4c99cc9cbfa8761b3ddc7bd6650bad33302f 33a35400ad5aad2291371a, cn=Atul Ashok Kode
Date: 2019.02.14 11:16:28 +05'30'

**( अतुल कोदे )**
सह सचिव
महसूल व वन विभाग

**प्रति -**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक व्याघ्र प्रकल्प, मेळघाट, अमरावती
४. महालेखापाल (लेखा परीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/ नागपूर.
(त्यांना विनंती करण्यात येते कि, महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ खंड-१ मधील नियम १५(२) व १५ (३) नुसार उपरोक्त अधिकाऱ्यास प्राधिकृत करण्याची पुढील कार्यवाही करण्यात करावी.)
५. संचालक, लेखा व कोषागार, संचालनालय, मुंबई.
६. वरीष्ठ लेखा कोषागार अधिकारी, नागपूर / मुंबई.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
८. सहसंचालक, (तांत्रिक) लेखा व कोषागार, मुंबई.
९. वित्त विभाग, कार्यासन कोषा. प्र-५, मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती (फ-२), महसूल व वन विभाग.